**साखर आयुक्तालय, पुणे येथे जागतिक दर्जाचे साखर संग्रहालय ( Museum ) उभारणी करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन,**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : ससाका २०२१/प्र.क्र.१०३/ २५ – स,**
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२,
दिनांक : १२.१०.२०२१.

**वाचा :-** साखर आयुक्त यांचे पत्र क्र. सा आ / कक्ष १५ / तांत्रिक शाखा / साखर संग्रहालय / ४५७ /२०२१ दि. १६.२.२०२१

**प्रस्तावना :-**

भारतातील साखर उद्योग हा कृषी आधारीत उद्योगांमध्ये दुस-या क्रमांकावर असून जागतिक साखर उत्पादनामध्ये देखील भारत ब्राझीलनंतरचा सर्वात जास्त उत्पादन घेणारा देश आहे. भारताची साखर उद्योगाची उलाढाल सुमारे ८०,००० कोटींवर पोहोचली आहे. महाराष्ट्र हे ऊस उत्पादनात उत्तर प्रदेशानंतर अग्रेसर राज्य असून महाराष्ट्राच्या जडणघडणीमध्ये साखर उद्योगाचे महत्वपूर्ण योगदान झालेले आहे.

साखर उद्योगाविषयी संपूर्ण माहिती उपलब्ध होण्यासाठी , ऊस उत्पादन, साखरेचे उत्पादन, गूळ , खांडसरी साखर उत्पादन तसेच साखरेपासून बनणारे उपपदार्थ उदा. आसवणी प्रकल्प, इथेनॉल, कंपोस्ट खत, सहवीज निर्मिती इ. ची माहिती अभ्यांगतांना मिळण्यासाठी आणि शेतकरी, पर्यटकांना,विद्यार्थ्यांना,देशोदेशीच्या अभ्यासकांना उपयुक्त व प्रेरणादायी ठरेल व साखर संग्रहालय महाराष्ट्रासाठी तसेच देशासाठी मानबिंदू ठरेल, या दृष्टीने महाराष्ट्राचे साखर उद्योगाचे स्थान विचारात घेता जागतिक दर्जाचे साखर संग्रहालय (Museum) पुणे येथे उभारण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मंत्रिमंडळाच्या दि २२.९.२०२१ रोजी झालेल्या बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार पुणे येथील साखर संकुलातील अंदाजे पाच एकर जागेत साखर संग्रहालय (Museum) उभारणीस मान्यता देण्यात येत आहे.

- **साखर संग्रहालयामध्ये समाविष्ट बाबी :-**

१. साखर संग्रहालयाद्वारे जागतिक स्तरावरील तसेच देशांतर्गत साखरेसंबंधी आवश्यक माहिती उपलब्ध करुन देणे.
२. गुळ/ साखर निर्मितीचे प्रात्यक्षीकांसह अद्ययावत मशिनरी (demo).
३. गुऱ्हाळ/ साखर कारखान्यांची सूक्ष्म प्रतिकृती.
४. साखर उद्योगाबाबत अकांत्मक (Digital) प्रदर्शनी.
५. साखर उद्योगामध्ये उत्पादीत होणाऱ्या सर्व वस्तुंचे विक्री केंद्र.
६. प्रेक्षागृह (Amphitheatres).
७. साखर आधारित चहापान गृह (Sugar themed Cafe).
८. सुसज्ज ग्रंथालय.
९. कला दालन.
१०. सभागृह.

११. पार्किंग सुविधा.

१२. स्मरणिका पुस्तकालय (Souvenir Shop).

२. साखर संग्रहालयाच्या उभारणीसाठी राज्य स्तरावर खालीलप्रमाणे नियामक समिती स्थापन करण्यात येत आहे.

**राज्यस्तरीय नियामक समितीची रचना :**

| | |
|---|---|
| १. मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) | : अध्यक्ष |
| २. मा. मंत्री (सहकार व पणन) | : सदस्य |
| ३. मा. राज्यमंत्री (सहकार) | : सदस्य |
| ४. मा. अपर मुख्य सचिव (सहकार) | : सदस्य |
| ५. साखर आयुक्त | : सदस्य सचिव |

**राज्यस्तरीय समितीचे कामकाज :**

१) साखर संग्रहालयाच्या प्रस्तावित योजनेस प्रशासकीय मान्यता देणे.

२) संग्रहालयाचे डिझाईन अंतिम करणे.

३) निधी उपलब्ध करुन देणे.

४) संग्रहालयाच्या बांधकाम विषयक कामकाजाचा आढावा घेणे.

३. साखर संग्रहालयाच्या प्रत्यक्ष उभारणी कामकाजावर देखरेखीसाठी खालीलप्रमाणे कार्यकारी समिती स्थापन करण्यात येत आहे.

**कार्यकारी समितीची रचना :**

| | |
|---|---|
| १. मा. मंत्री (सहकार व पणन) | : अध्यक्ष |
| २. साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे | : सदस्य |
| ३. महासंचालक , वसंतदादा शुगर इन्स्टीटयुट, मांजरी, पुणे | : सदस्य |
| ४. संचालक (प्रशासन), साखर आयुक्तालय,पुणे | : सदस्य |
| ५. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी साखर कारखाना संघ मर्यादित , मुंबई | : सदस्य |
| ६. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकांम विभाग, पुणे | : सदस्य |
| ७. उपमुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे | : सदस्य |
| ८. वास्तूविद्या विशारद | : सदस्य |
| ९. बांधकाम कंत्राटदार | : सदस्य |
| १०.कार्यकारी अभियंता, साखर आयुक्तालय, पुणे | : सदस्य सचिव |

वर नमूद केलेल्या सदस्यांशिवाय कार्यकारी समितीस गरजेप्रमाणे निमंत्रित सदस्य बोलविता येतील. सदरची कार्यकारी समिती साखर संग्रहालय उभारणीबाबत सर्वंकष विचार करुन वेळोवेळी राज्यस्तरीय समितीस व शासनास योग्य त्या मंजूरीसाठी प्रस्ताव सादर करेल.

४. साखर संग्रहालय उभारणीसाठी अंदाजे रु. ४० कोटी पर्यत खर्च अपेक्षीत असून त्यासाठी साखर आयुक्त, पुणे याना तीन वर्षात सदर निधी उपलब्ध करुन देण्यात येईल. यासाठी नवीन लेखाशीर्ष उघडून त्यास महालेखापाल यांची मान्यता घेण्याची कार्यवाही स्वतंत्रपणे करण्यात येत आहे.

५ . साखर संग्रहालयाच्या उभारणीबाबतचे Design राष्ट्रीय स्तरावरील स्पर्धेतून निवड करण्यात यावी .

६. साखर संग्रहालयाची देखभाल व दुरुस्ती खर्च करणेसाठी प्रवेश फी आकारणी मधून तसेच साखर संकुल वटनावळ निधी मधून करण्यात यावी.

७. सदर शासन निर्णय राज्य मंत्रिमंडळाच्या दिनांक २२.९.२०२१ रोजी झालेल्या बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयास अनुसरुन आणि वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ४४३/२०२१/ व्यय-२, दिनांक ८.१०.२०२१ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२११०१२१७५०५७८८०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Pramod Mankoji Valanj

Digitally signed by Pramod Mankoji Valanj
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-operation Markerting And Textiles Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e9e7fafe78ccbad1148295b75b2b4a0fc30e01ea267cb61e5d741e2bf211f323, serialNumber=e3201d81f1fe894c5b90177e9d94ac2f3ea71a180d71893c72721e9ddef50210, cn=Pramod Mankoji Valanj
Date: 2021.10.12 18:18:16 +05'30'

**( प्रमोद मा. वळंज )**
**अवर सचिव , महाराष्ट्र शासन**

**प्रत :--**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव ,
३. मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव ,
४. मा. मंत्री ( सर्व), मंत्रालय, , मुंबई
५. मा. राज्यमंत्री (सर्व) मंत्रालय, मुंबई
६. मा. विरोधी पक्ष नेता (विधानपरिषद / विधानसभा ), महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७. मा. विधानपरिषद सदस्य / विधानसभा सदस्य (सर्व ) , महाराष्ट्र राज्य
८. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
९. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग , मंत्रालय, मुंबई,
१०. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
११. प्रधान सचिव (सहकार व पणन ), सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय, मुंबई,
१२. सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१३. साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य , साखर संकुल, शिवाजी नगर, पुणे,
१४. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी साखर कारखाना संघ मर्यादित,नरिमन पॉईंट, मुंबई
१५. महासंचालक, वसंतदादा शुगर इन्स्टीटयुट, मांजरी, पुणे
१६. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकांम विभाग, पुणे
१७. कार्यकारी संचालक,महाराष्ट्र राज्य सहकारी बँक मर्या. मुंबई
१८. संचालक (प्रशासन), साखर आयुक्तालय,पुणे
१९. उप मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे
२०. सर्व उप सचिव /अवर सचिव व कक्ष अधिकारी, सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय, मुंबई,
२१. निवडसंग्रह (३स/२५-स) सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.